**दापोली नगरपंचायत हद्दीतील रस्त्यांची**
**लांबी अवर्गीकृत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.११३/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १० जुलै, २०१७.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे
पत्र क्र.मुअ(मुं)/रेशाचित्र शाखा/रस्तेहस्तांतरण-१२६/२६३३
दिनांक ०५/०६/२०१७.
२) शासन निर्णय क्रमांक आरबीडी-१०८१/८७१/रस्ते-७
दिनांक ९ मार्च २००१.

**प्रस्तावना :-**

रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली नगरपंचायत हद्दीमधून जाणा-या रस्त्यांना बाह्यवळण रस्ता झाला आहे. सदर बाह्यवळण रस्त्यावरुन वाहतूक सुरळीतपणे होत असल्याने तसेच मुख्याधिकारी नगरपंचायत , दापोली यांनी “सदरचे रस्ते अवर्गीकृत केल्यानंतर त्यांच्या देखभाल व दुरूस्तीचा खर्च करण्यास तसेच रस्त्यावर अतिक्रमण होऊ न देणेबाबत नगरपंचायत बांधील असल्याचे हमीपत्र सादर केलेले आहे. तसेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्याअनुषंगाने सदर रस्त्यांची दापोली नगरपंचायत हद्दीतील लांबी अवर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णयातील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली नगरपंचायत हद्दीतील खालीलप्रमाणे दोन रस्त्यांची लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रस्त्याचे नाव | अवर्गीकृत करावयाचा लांबीचा साखळी क्रमांक | लांबी (कि.मी.) |
|---|---|---|---|
| १. | मांदाड तळा इंदापूर रायगड महाड लाटवण विसापूर दापोली रस्ता रा.मा. क्र. ९७ | ५४/८०० ते ५६/२०० व ५६/३०० ते ५६/६०० | १.७०० कि.मी. |
| २. | दापोली वाकवली साखरोली खेड रस्ता रा.मा.१६२ | ०/०० ते ०/९०० | ०.९०० कि.मी. |
| **एकूण** | | | **२.६०० कि.मी.** |

अशी एकूण **२.६०० कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. केळसर नाका ते बुरोंडी नाका हा (०/०० ते १/००) हा रस्ता योजनाबाह्य रस्ता असल्याने त्याची लांबी कोणत्याही रस्त्यात अंतर्भूत नाही. सदरचा रस्ता दापोली नगरपंचायत हद्दीत असल्याने नगरपंचायतीने त्याची देखभाल दुरूस्ती करणे क्रमप्राप्त आहे. तसेच उपरोक्त दोन रस्त्यांच्या देखभाल-दुरुस्तीचा खर्च दापोली नगरपंचायतकडून करण्यात येईल व “अवर्गीकृत केलेल्या रस्त्यांवर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही” या अटीच्या अधीन राहून सदर दापोली नगरपंचायत हद्दीतील रस्त्यांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७११११३५२१७४९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb818845016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.07.11 13:53:09 +05'30'

**( प्रकाश इंगोले )**
उप सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) विभागीय आयुक्त, मुंबई.

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, रत्नागिरी (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

४) जिल्हाधिकारी, रत्नागिरी.

५) मुख्याधिकारी, दापोली नगरपंचायत.

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चिपळूण.

७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, रत्नागिरी.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.